**शैक्षणिक वर्ष २०२५-२६ करीता नवीन विधी महाविद्यालयांच्या अंतिम मान्यतेस मुदतवाढ देण्याबाबत.**
**(न्यायालयीन प्रकरण)**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :मान्यता-२०२५/ई:१०३०४६६/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ मार्च, २०२५.

**संदर्भ:** १. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी २०१७/(२९/१७)/मशि-४, दिनांक १५.०९.२०१७.
२. शासन आदेश , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मान्यता-२०२३/प्र.क्र.९५/मशि-४, दिनांक १५.०६.२०२३.
३. त्रिमूर्ती शिक्षण प्रसारक मंडळ या संस्थेचे निवेदन दि. २४.०७.२०२४.
४. रिट याचिका क्र.१९५१७ २०२४ त्रिमूर्ती शिक्षण प्रसारक मंडळ विरुध्द सचिव, भारतीय विधीज्ञ परिषद व इतर प्रकरणी मा. उच्च न्यायालय मुंबई यांनी दिलेले आदेश दिनांक १३.०३.२०२५.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ आणि संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णय दिनांक १५.०९.२०१७ अन्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार संदर्भ क्र.२ येथील शासन आदेश दिनांक १५.०६.२०२३ अन्वये शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून खालील विवरणपत्रात नमूद महाविद्यालयास अंतिम मान्यता देण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|
| | **सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे** | |
| १. | त्रिमूर्ती शिक्षण प्रसारक मंडळ पत्ता: मु. पो. लोणीकंद, रामनगर, ता. हवेली, जि. पुणे ता: हवेली जि:पुणे पिन: ४१२२१६ शिल्पकार लॉ कॉलेज पत्ता: लोणीकंद ता: हवेली (महानगर पालिका हद्द वगळून) जि:पुणे पिन: ४१२२१६ | सर्वसाधारण मानवविज्ञान- बॅचलर ऑफ लॉ (एल. एल. बी.) तीन वर्ष |

संदर्भ क्र.२ येथील शासन आदेशान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार उपरोक्त विवरणपत्रातील महाविद्यालय शैक्षणिक वर्ष २०२३-२४ अथवा २०२४-२५ मध्ये सुरू करणे अभिप्रेत होते. सदर विधी महाविद्यालयाने विहीत कालमर्यादेत भारतीय विधीज्ञ परिषदेकडे संलग्निकरणाबाबतचा अर्ज सादर केलेला होता. परंतु, भारतीय विधीज्ञ परिषदेची मान्यता प्राप्त न झाल्याने सदर विधी महाविद्यालय विहीत कालावधीत सुरू होऊ शकले नाही.

याचिकादार संस्थेने शासनास सादर केलेले संदर्भ क्र.३ येथील दि.२४.०७.२०२४ रोजीचे निवेदन तसेच रिट याचिका क्र.१९५१७/२०२४ त्रिमूर्ती शिक्षण प्रसारक मंडळ विरुध्द सचिव, भारतीय विधीज्ञ परिषद व इतर प्रकरणी मा. उच्च न्यायालय मुंबई यांनी दि. १३.०३.२०२५ रोजी दिलेले आदेश विचारात घेऊन, त्रिमूर्ती शिक्षण प्रसारक मंडळ संचलित शिल्पकार लॉ कॉलेज या विधी महाविद्यालयास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये **कायम विनाअनुदान तत्वावर** दिलेल्या **अंतिम मान्यतेस शैक्षणिक वर्ष २०२५-२६ करीता** मुदतवाढ देण्यात येत आहे.

संदर्भ क्र.२ येथील शासन आदेशान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीमधील अट क्र.९ वगळता उर्वरित सर्व अटी व शर्ती संबंधित अंतिम मान्यतेच्या अनुषंगाने लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२५११३९३३७७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.03.25 11:41:54 +05'30'

**(अशोक मांडे)**

**उप सचिव, महराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्य मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे,
१०. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे,
१२. निवडनस्ती (मशि-४).